श्रीक्षेत्र जोतीबा, ता.पन्हाळा,
जि.कोल्हापूर या तीर्थक्षेत्राच्या विकास
आराखडयांतील कामांस प्रशासकीय
मान्यता देऊन निधी वितरीत
करणेबाबत

## महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः तिर्थवि-२०१६/प्र.क्र.१६२/योजना-६
बांधकाम भवन, २५ मर्झबान मार्ग,
फोर्ट, मुंबई-४०० ००१
तारीख: १ ऑगस्ट, २०१७

**वाचा :-**

१) जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांचे पत्र क्रमांकः नियो/कार्या-१८/श्रीक्षेत्रजोतीबाआ/ १०५०/२०१६, दिनांक १६ ऑगस्ट २०१६ अन्वये सादर केलेला प्रस्ताव
२) नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१५/प्र.क.६/१४४४, दिनांक ४ जून २०१५
मा.मुख्यसचिव यांचे अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीच्या दिनांक १३ जानेवारी २०१७ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त
४) मा.मुख्यमंत्री यांचे अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय शिखर समितीच्या दिनांक १४ मार्च २०१७ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त

**प्रस्तावना :-**

श्रीक्षेत्र जोतीबा, ता.पन्हाळा, जि.कोल्हापूर या तीर्थक्षेत्राच्या विकास आराखडयास निधी उपलब्ध करुन देणेबाबत स्थानिक विधानसभा सदस्यांनी मा.मुख्यमंत्री महोदयांना विनंती केली होती. त्यानुसार जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी जिल्हास्तरीय समित्यांच्या मान्यतेने श्रीक्षेत्र जोतीबा, ता.पन्हाळा, जि.कोल्हापूर या तीर्थक्षेत्राच्या विकासाचा एकूण रु.२५००.०० लक्ष इतक्या किंमतीचा आराखडा शासन मान्यतेसाठी सादर केला आहे.

२. सदर आराखडयातील एकूण रु.२५००.०० लक्ष इतक्या किंमतीच्या कामांच्या प्रस्तावास व खर्चास नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांक तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.६/का-१४४४, दिनांक ४ जून २०१५ मधील तरतूदींनुसार मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समिती व मा.मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय शिखर समितीने मान्यता दिली आहे. त्यानुसार सदर आराखडयातील रु.२५००.०० लक्ष एवढया अंदाजपत्रकीय किंमतीच्या कामांना प्रशासकीय मान्यता देऊन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी सादर केलेल्या व राज्यस्तरीय समित्यांनी मान्यता दिलेल्या श्रीक्षेत्र जोतीबा, ता.पन्हाळा, जि.कोल्हापूर या तीर्थक्षेत्राच्या आराखडयातील एकूण रु.२५००.०० लाख (रुपये पंचवीसशे लाख फक्त) इतक्या किंमतीच्या खालील कामांना प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | कामाचे नांव | अंदाजपत्रकीय किंमत (रुपये लाखात) | प्रशासकीय मान्यता (रुपये लाखात) |
|---|---|---|---|
| १ | दर्शन मंडप बांधकाम | ७००.०० | ७००.०० |
| २ | टॉयलेट कॉम्प्लेक्स बांधकाम | ३५६.०० | ३५६.०० |
| ३ | सेंट्रल प्लाझा ॲम्फीथिएटरसह विकसित करणे | ६००.०० | ६००.०० |
| ४ | घनकचरा व सांडपाणी व्यवस्था | ३२७.०० | ३२७.०० |
| ५ | दर्शन मार्गावर अडथळे येणाऱ्या आवश्यक ठिकाणचा विद्युत पुरवठा भूमिगत करणे | १००.०० | १००.०० |
| ६ | भक्तनिवास | २६०.०० | २६०.०० |
| ७ | पाणीपुरवठा | १५७.०० | १५७.०० |
| | **एकूण** | **२५००.००** | **२५००.००** |

२. ग्रामीण भागातील तीर्थक्षेत्रांच्या विकासाकरीता अनुदान (रु.२ कोटी ते रु.२५ कोटीपर्यंत) या योजनेअंतर्गत राज्यातील ग्रामीण तीर्थक्षेत्रांना निधी वितरीत करण्यासाठी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात एकूण रु.५०००.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. सदर अर्थसंकल्पीत निधीतून प्रशासकीय मान्यता दिलेल्या निधीपैकी प्रथम टप्प्यात रु.५००.०० लाख (रुपये पाचशे लाख फक्त) इतका निधी जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे.

३. वरील कामांकरीता कार्यान्वयीन यंत्रणा व देखभाल दुरुस्ती यंत्रणा खालीलप्रमाणे राहतील

| अ. क्र. | कामाचे नांव | कार्यान्वयीन यंत्रण | देखभाल दुरुस्ती यंत्रणा |
|---|---|---|---|
| १ | दर्शन मंडप बांधकाम | पश्चिम महाराष्ट्र देवस्थान व्यवस्थापन समिती | पश्चिम महाराष्ट्र देवस्थान व्यवस्थापन समिती |
| २ | टॉयलेट कॉम्प्लेक्स बांधकाम | पश्चिम महाराष्ट्र देवस्थान व्यवस्थापन समिती | पश्चिम महाराष्ट्र देवस्थान व्यवस्थापन समिती |
| ३ | सेंट्रल प्लाझा ॲम्फीथिएटरसह | पश्चिम महाराष्ट्र देवस्थान | पश्चिम महाराष्ट्र देवस्थान |

| अ. क्र. | कामाचे नांव | कार्यान्वयीन यंत्रण | देखभाल दुरुस्ती यंत्रणा |
|---|---|---|---|
| | विकसित करणे | व्यवस्थापन समिती | व्यवस्थापन समिती |
| ४ | घनकचरा व सांडपाणी व्यवस्था | जिल्हा परिषद, कोल्हापूर | जिल्हा परिषद, कोल्हापूर |
| ५ | दर्शन मार्गावर अडथळे येणाऱ्या आवश्यक ठिकाणचा विद्युत पुरवठा भूमिगत करणे | महावितरण | महावितरण |
| ६ | भक्तनिवास | पश्चिम महाराष्ट्र देवस्थान व्यवस्थापन समिती | पश्चिम महाराष्ट्र देवस्थान व्यवस्थापन समिती |
| ७ | पाणीपुरवठा | महाराष्ट्र जीवन प्राधिकरण | महाराष्ट्र जीवन प्राधिकरण /जिल्हा परिषद, कोल्हापूर/ ग्रामपंचायत, वाडी रत्नागिरी, ता.पन्हाळा |

३. जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामांपैकी, कामांचा प्राथम्यक्रम निश्चित करावा व तद्‌नंतरच सदर का़मांवर निधी खर्च करण्यात यावा.

४. सदर निधी आहरण करुन संबंधित कार्यान्वयीन यंत्रणेला वितरीत करण्यासाठी जिल्हा नियोजन अधिकारी/ सहाय्यक जिल्हा नियोजन अधिकारी, कोल्हापूर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर कामांचे नियोजन व खर्चाचे सनियंत्रण, नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक तीक्षेवि-२०१५/प्र.क.६/१४४४, दिनांक ४ जुन २०१५ अन्वये गठीत करण्यात आलेल्या जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हा़स्तरीय कार्यकारी समितीकडे सोपविण्यात येत आहे. समितीची कार्यकक्षा शासन निर्णयात नमूद केल्यानुसार राहिल.

६. जिल्हास्तरीय कार्यकारी समितीने कामांच्या अंमलबजावणीसाठी संबंधीत कार्यान्वयीन यंत्रणांशी समन्वय साधावा व कामे विहीत कालावधीत पूर्ण होण्यासाठी आवश्यक त्या उपाययोजना कराव्यात.

७. सदर कामांच्या अंदाजपत्रकांना सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता असल्याची खात्री करावी.

८. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी मागणी क्र. मागणी क्रमांक एल-३-२५१५-इतर ग्राम विकास कार्यक्रम-१९६-जिल्हा परिषद/ जिल्हास्तरीय पंचायतींना सहाय्य (००)

(०७) ग्रामीण भागातील तीर्थक्षेत्रांच्या विकासाकरीता अनुदान (रु.२ कोटी ते रु.२५ कोटीपर्यंत) (२५१५२५२१)-३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) (दत्तमत) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सदर लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

९. सदर वितरण सुधारित मासिक विवरणपत्राच्या मर्यादेत आहे.

१०. सदर निधी वितरीत करतांना वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८ एप्रिल २०१७ मधील अटी व शर्तींचे पालन करण्यात आले आहे.

११. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८ एप्रिल २०१७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८०११०५४३५७२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Manoj D Jadhav

Digitally signed by Manoj D Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a83fc829949e9b1a022b031436c946028b48d51f5a1bf36ca3ce4fead857da72, cn=Manoj D Jadhav
Date: 2017.08.04 10:13:35 +05'30'

**(मनोज जाधव)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
२. मा.मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.).यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर
६. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर
७. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. प्रधान सचिव (बांधकाम), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
११. सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन, मंबई

१२. विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, पुणे विभाग, पुणे
१३. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, कोल्हापूर
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर
१५. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद , कोल्हापूर
१६. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, कोल्हापूर
१७. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर
१८. नियोजन विभाग (का.१४७४/१४४४) मंत्रालय, मुंबई-३२.
१९. वित्त विभाग (व्यय -१५, अर्थसंकल्प-१६/१७), मंत्रालय, मुंबई ३२.
२०. कक्ष अधिकारी, कार्यासन क्र.वित्त-७, वित्त-१, वित्त-८, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
२१. निवड नस्ती (का.यो-६). ग्राम विकानस व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.